**पिंपरी चिंचवड महानगरपालिका**
मौजे चिंचवड येथील स.नं. २९३ मधील आ.क्र. २२९ मधील स्मशानभूमीसाठी आरक्षित जागा निवासी विभागात समाविष्ट करण्याबाबतचा महापालिका सभेने पारित केलेला ठराव विखंडीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग,**

शासन निर्णय क्रमांक: पीसीसी ३००५/२६०५/प्र.क्र.३२७/२००६/नवि-२२
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक: ०९/१०/२००९

वाचा :- १) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. नरवि/ कावि/ १३/२३४/०५, दि. १६.०६.२००५ व त्यासोबतचा ठराव क्र. ५११९ दि. ९.२.२००४

२) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. नरवि/ कावि/ १३/३७१/०५, दि. १५.१०.२००५

३) या विभागाचा समक्रमांक चा शासन निर्णय दि. २४ एप्रिल, २००८.

४) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. नरवि/ कावि/ १३/१०१/२००८, दि. ४.७.२००८ व त्यासोबतचा ठराव क्र. ३९७ दि. २०.६.२००८.

५) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. नरवि/ कावि/ १३/२९६/२००८, दि. २२.९.२००९

प्रस्तावना:- पिंपरी चिंचवड महानगरपालिकेतील मौजे चिंचवड येथील स.नं. २९३ मधील २ एकर क्षेत्र आरक्षण क्र. २२९ अन्वये स्मशानभूमी या प्रयोजनासाठी आरक्षित आहेत. सदर जमिनीच्या हितसंबंधितांनी सन १९९८ मध्ये केलेल्या विनंतीवरुन सदर आरक्षणाची जागा विकास नियंत्रण नियमावलीतील तरतुदीनुसार त्याच मिळकतीच्या दुस-या टोकाला स्थलांतरित करण्यात आली. सदर आरक्षण रद्द करुन सदरची जागा निवासी विभागात समाविष्ट करण्याबाबत महासभेने क्र. ५११९ दि. ९.२.२००४ अन्वेय ठराव पारीत केला आहे. नियोजन प्रमाणकानुसार सदर स्मशानभूमीच्या आरक्षणाची आवश्यकता असल्याने स्मशानभूमीचे आरक्षण रद्द न करता सदर ठराव आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांच्या प्रस्तावानुसार नगररचना शाखेचे अभिप्राय घेवून मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ चे कलम ४५१ अन्वये संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आले. व त्यानुषंगाने संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास, तसे अभिवेदन या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासनास सादर करण्याबाबतच्या सुचना देण्यात आल्या.

D:\PIMPARI CHINCHAWAD\Tharav Smashan\Bhumi.doc

०२. प्रस्तुत प्रकरणी रिव्हरसाईड रिझॉर्टस प्रा.लि. यांच्याकडून वेळोवेळी प्राप्त निवेदनाच्या अनुषंगाने आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांनी दि.२२.९.२००९ च्या पत्रान्वये अभिप्राय तसेच दिनांक ४.७.२००८ रोजीच्या पत्रान्वये महानगरपालिकेचे अभिवेदन सादर केले आहे. पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या महासभेने ठराव क्र. ३९७ दि. २०.६.२००८अन्वये आरक्षण क्र. २२९ हे स्मशानभूमीवर सार्जानिक प्रयोजनासाठी आवश्यक असल्याने व सदर आरक्षणाचे भूसंपादन सुरु असल्याने सदर आरक्षण रद्द न करता तसेच ठेवून त्याच्या संपादनाची कार्यवाही शीघ्रगतीने करण्यात यावी, असा ठराव पारीत केला आहे, असे आयुक्तांनी सादर केलेल्या दिनांक ४.७.२००८ च्या अभिवेदनाद्वारे कळविले आहे.

०३. रिव्हरसाईड रिझॉर्टस प्रा.लि. यांच्या निवेदनातील मुद्दे व आयुक्तांचे अभिप्रायावर नगररचना शाखेचे अभिप्राय घेण्यात आले. सदर अभिप्रायाच्या अनुषंगाने तसेच शासनाच्या मंजूर आराखड्यानुसार/नियोजन प्रमाणकानुसार सदर आरक्षणाची स्मशानभूमीच्या प्रयोजनासाठीची आवश्यकता विचारात घेता, प्रस्तुत प्रकरणी महानगरपालिका महासभेने पारित केलेला ठराव क्र. ५११९ दिनांक ९.२.२००४ विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेतील मौजे चिंचवड येथील स.नं. २९३ वर आ.क्र.२२९ स्मशानभूमी या प्रयोजनासाठी असलेले आरक्षण रद्द करुन सदरची जागा निवासी विभागात समाविष्ट करण्याबाबत महासभेने ठराव क्र. ५११९ दि. ९.२.२००४, पारित केलेला आहे. शासनाच्या मंजूर आराखड्यानुसार/नियोजन प्रमाणकानुसार स्मशानभूमी या प्रयोजनासाठी सदर आरक्षणाची आवश्यकता असल्याने सदर ठराव क्र. ५११९ दि. ९.२.२००४ हा मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ अन्वये विखंडीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आ.श्रा. जिवने)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव यांचे स्विय सहायक नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
४. निवडनस्ती, नगर विकास विभाग (नवि-२१), मंत्रालय, मुंबई-३२